मानव विकास कार्यक्रमांतर्गत “ग्रामीण भागातील सर्वच मुलींना इयत्ता १२ वी पर्यंत शिक्षण घेणे शक्य व्हावे, याकरिता गांव ते शाळा दरम्यान वाहतुकीची सुविधा उपलब्ध करून देणे” या योजनेअंतर्गत बीड व अमरावती जिल्ह्यांकरिता अतिरिक्त बसेस उपलब्ध करुन देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**नियोजन विभाग,**
**शासन निर्णय क्र. :-माविका-२०१४/प्र.क्र.२३/का.१४१८**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,**
**दिनांक -: ३० मार्च, २०१७.**

वाचा :- १) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र माविमि-२०१०/प्र.क्र.८१/का.१४१८, दि.१९ जुलै,२०११.
२) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र माविका-२०१२/प्र.क्र.६९/का.१४१८, दि.१२ जुलै,२०१२.
३) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र माविका-२०१४/प्र.क्र२३./का.१४१८, दि. २७ मार्च २०१४.

प्रस्तावना :-

उपरोक्त संदर्भिय क्र.(१)अन्वये राज्यातील निवडलेल्या २३ अतिमागास जिल्ह्यांतील १२५ तालुक्यांमध्ये मानव विकास कार्यक्रम राबविण्यात येत आहे. यामध्ये शिक्षण विषयक योजनांमध्ये “ ग्रामीण भागातील सर्वच मुलींना इयत्ता १२ वी पर्यंत शिक्षण घेणे शक्य व्हावे याकरिता गांव ते शाळा दरम्यान वाहतुकीची सुविधा उपलब्ध करून देणे” या योजनेचा समावेश आहे.

२. प्रस्तुत योजनेअंतर्गत प्रत्येक तालुक्यांसाठी ५ बसेस यानुसार राज्यातील १२५ तालुक्यांसाठी ६२५ बसेस खरेदी करण्यात आल्या आहेत. तसेच संदर्भिय क्र.(३)च्या शासन निर्णयान्वये अमरावती व बीड जिल्हयातील ३ तालुके (चिखलदरा,धारणी व वडवणी) वगळता, उर्वरित १२२ तालुक्यांसाठी प्रत्येकी २ बसेस याप्रमाणे एकूण २४४ अतिरिक्त बसेस उपलब्ध करुन देण्यात आल्या आहेत.

३. सदर योजनेअंतर्गत बीड जिल्हयातील वडवणी तालुक्यासाठी शाळेची वेळ व मुलीची संख्या विचारात घेता,जिल्हाधिकारी बीड यांनी २ बसेस व जिल्हाधिकारी,अमरावती यांनी धारणी तालुक्यासाठी १ बस अश्या एकूण ३ अतिरिक्त बसेसची मागणी केली आहे. सदर मागणी विचारात घेता, राज्य परिवहन महामंडळास अतिरिक्त ३ बसेस उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्या प्रस्तावास अनुसरून शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे:-

शासन निर्णय :-

४. मानव विकास कार्यक्रमांतर्गत “ ग्रामीण भागातील सर्वच मुलींना इयत्ता १२ वी पर्यंत शिक्षण घेणे शक्य व्हावे याकरिता गांव ते शाळा दरम्यान वाहतुकीची सुविधा उपलब्ध करून देणे” या योजनेअंतर्गत बीड जिल्ह्यातील वडवणी तालुक्यासाठी दोन व अमरावती जिल्ह्यातील धारणी तालुक्यासाठी एक अश्या एकूण अतिरिक्त तीन बसेस उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर अतिरिक्त बसेसच्या खरेदीची कार्यवाही राज्य परिवहन महामंडळाने संदर्भ क्रमांक (१) च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार करावी. यासाठी प्रति बस अंदाजित ₹ २० लक्ष याप्रमाणे एकूण ३ बसेससाठी ₹६०.०० लक्ष इतका खर्च अपेक्षित आहे. राज्य परिवहन महामंडळाने बसेसच्या खरेदीसाठी आवश्यक ती कार्यवाही करुन, खरेदीसाठी लागणाऱ्या निधीची मागणी मानव विकास आयुक्तालयाकडे करावी.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक **२०१७०३३०१५०५४६६८१६** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish J Moghe

Digitally signed by Satish J Moghe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6230073c6c2b69dbf76e5210974f85eec0496e45eb4319228925521689fc99e6, cn=Satish J Moghe
Date: 2017.03.30 16:13:41 +05'30'

**(स.ज.मोघे)**
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव.
३) मा.मंत्री/ राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव
४) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
५) महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
६) शासनाचे मुख्य सचिव.
७) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव,
८) मा.कार्यकारी अध्यक्ष राज्य नियोजन मंडळ, नवीन प्रशासकीय भवन, १८ वा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई-३२.
९) आयुक्त ,मानव विकास आयुक्तालय,बाबा पेट्रोलपंपजवळ,अदालत रोड, औरंगाबाद
१०)उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, वाहतूक भवन, डॉ. ए. एन. मार्ग, मुंबई ४०० ००८.
११) विभागीय आयुक्त , (सर्व)
१२) जिल्हाधिकारी , (संबधित)
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, (संबधित)
१४) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र शासन, मुंबई.
१५) उपायुक्त, नियोजन, विभागीय आयुक्त कार्यालय,(सर्व)
१६) जिल्हा नियोजन अधिकारी ,( संबधित)
१७) जिल्हा कोषागार अधिकारी ,( संबधित)
१८) नियोजन विभागातील सर्व सह सचिव/ उप सचिव
१९) निवड नस्ती (का.१४१८), नियोजन विभाग